**मंत्रालय उपाहारगृहाला उधार विक्रीपोटी विविध शासकीय विभाग/कार्यालयाकडून येणे असलेल्या थकित रकमेबाबत...**

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे),
परिपत्रक कमांक ओएसबी-१०८८/थ.प.वि/मंउका,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांकः- १ जून, १९८८**

पहा : शासकीय परिपत्रक क्रमांक.जीएडी/सीएनटी/रिकव्हरी ॲरीयर्स/१९६६,दिनांक. ३१ जानेवारी, १९६६

**परिपत्रक**

मंत्रालय उपाहारगृह शासनातर्फे अवाणिज्य तत्वावर सन १९५९ सालापासून सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली चालविण्यात येत आहे. उपाहारगृहाचा लाभ शासकीय कर्मचारी/अधिकारी, मंत्री व राज्यमंत्री यांची कार्यालये तसेच मंत्रालयीन विभाग इत्यादी घेत असतात. मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्री, राज्यमंत्री यांची कार्यालये, वरीष्ठ अधिकारी तसेच शासकीय कामकाजानिमित्त होणा-या सभा/बैठकांकरीता उधार विक्री तत्वावर उपाहारगृहातर्फे मागणीप्रमाणे खाद्यपेये पुरविण्यात येतात. शासकीय कार्यालयांना कोषागारातून रक्कम काढण्यासाठी विहित कार्यपध्दती अनुसरावी लागत असल्याने देयकाची रक्कम वेळीच देणे शक्य नसते. त्यामुळे शासकीय कार्यालयांची गैरसोय होऊ नये म्हणून सदर कार्यालयांना उधार विक्री सवलत देण्यात आली आहे.

२. शासकीय कार्यालयाने उपाहारगृहाची देयके न चुकता एक महिन्याच्या आत भरणा करावीत. अशा सूचना वर नमूद करण्यात आलेल्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत. तथापि आता असे निदर्शनास आले आहे की, सर्व मंत्रालयीन विभाग/शासकीय कार्यालये यांच्याकडे उपाहारगृहाची खाद्यपेयासंबंधीची देयके फार काळ प्रलंबित आहेत. अशा प्रकारे उधार विक्री पोटी थकित असलेल्या रकमेसंबंधात महालेखापाल, मुंबई यांच्या कार्यालयाकडून उपाहारगृहाच्या लेखापरिक्षणाच्या वेळी अनेक आक्षेप घेण्यात येतात. उपाहारगृहाला येणे असलेली रक्कम फार काळ प्रलंबित राहिल्यास त्यांचा परिणाम उपाहारगृहाच्या लेख्यावर होतो. यास्तव, मंत्री, राज्यमंत्री यांची कार्यालये व सर्व मंत्रालयीन विभाग व इतर शासकीय कार्यालये यांना सूचना देण्यात येत आहेत की, मंत्रालय उपाहारगृहाकडून देण्यात आलेल्या उधार विक्री सवलतीपोटी देय असलेली रक्कम उपाहारगृहाकडून देयक मिळाल्यापासून दोन महिन्यांच्या आत उपाहारगृहे कार्यालयाकडे अदा करण्यात यावीत. वरील मुदतीत देयके अदा केली जातात किंवा नाही हे पाहण्याची जबाबदारी खाद्यपदार्थांची मागणी नोंदविणा-या अधिका-यांची व तसेच संबंधित विभागातील आहरण व संवितरण अधिका-यांची राहील. उपाहारगृहाची देयके त्वरित अदा करण्याबाबत सर्व विभागांच्या आहरण व संवितरण अधिका-यांनी सहकार्य करणे अगत्याचे आहे.

कृ.मा.प.

वरील कालावधीत प्रलंबित देयकाच्या रकमेचा भरणा न केल्यास संबंधित विभाग/कार्यालयास व वरिष्ठ अधिका-यांस उपाहारगृहातर्फे देण्यात येत असलेली उधार विक्रीची सवलत नाइलाजाने बंद करण्याची सुध्दा कार्यवाही करावी लागेल. सर्व मंत्रालयीन विभाग व इतर शासकीय कार्यालये यांना विनंती करण्यात येत आहे की, त्यांनी वरील सूचना सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणाव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-
**( अ.का.भागवत )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)

प्रति,

१. मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२. मंत्री/राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई,
३. सर्व मंत्रालयीन विभाग,
४. मंत्रालयातील इतर सर्व कार्यालये,
५. व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह, मंत्रालय,
६. व्यवस्थापक, विधान भवन उपाहारगृह, विधान भवन, मुंबई,
७. व्यवस्थापक, कोकण भवन उपाहारगृह, कोकण भवन, नवी मुंबई,
८. नवीन प्रशासन भवन व कोकण भवन, नवी मुंबई येथील सर्व शासकीय कार्यालये.